**नाशिक जिल्हयामध्ये (पेसा) पेठ व त्र्यंबकेश्वर या दोन तालुक्यातील आदिवासी क्षेत्रात पाणी व स्वच्छता विषयी प्रशिक्षण राबविण्याच्या पथदर्शी प्रकल्पास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: आविवि २०१२/प्र.क्र. ३७/ का-१६**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई
दिनांक : ३० जून ,२०१५

**वाचा** :- १.शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : आरएजे -१०२२/मुंमस/प्र.क्र. १७/२०११/ २०अ/, दिनांक ३१.१.२०१२

२. शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्रमांक : व्हीआयपी २०१२/प्र.क्र. ३७/का-१६, दिनांक ५ मार्च,२०१३

३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक यांचे पत्र क्र. जिपना /ग्राप/निभाअ / १७६/२०१४, दिनांक २२ ८.२०१४ चे पत्र.

४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक यांचे पत्र क्र.जिपना /पाणी व स्वच्छता/ निभाअ / ५३०/१५, दिनांक १३. ५.२०१५ चे पत्र.

**प्रस्तावना :**

मा. राज्यपाल यांच्या कार्यालयात केंद्र शासनाच्या आदिवासी विकास मंत्रालयाने दिलेल्या सुचनेस अनुसरुन आदिवासी कक्षाची स्थापना, सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक ३१.१.२०१२ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे. सदर आदिवासी कक्षामार्फत करावयाची कार्यवाही तसेच या कक्षामार्फत राबविण्यात येणा-या पथदर्शी प्रकल्पाबाबत मार्गदर्शक तत्वे आदिवासी विकास विभागाच्या दिनांक ५.३.२०१३ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आलेले आहेत. त्यास अनुसरुन पथदर्शी प्रकल्प मंजूरी व सनियंत्रण समितीने दिनांक १७.३.२०१५ रोजी झालेल्या ५ व्या बैठकीमध्ये नाशिक जिल्हयातील त्र्यंबकेश्वर व पेठ या दोन तालुक्यातील आदिवासी क्षेत्रामध्ये ( पेसा ) पाणी व स्वच्छता विषयक कामांसाठी अभिप्रेरक ( Motivator) नियुक्त करुन त्यांना प्रशिक्षण देणे विषयीच्या प्रस्तावास मंजूरी दिलेली आहे. आता सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

पथदर्शी प्रकल्प मंजूरी व सनियंत्रण समितीने दिनांक १७.३.२०१५ रोजी झालेल्या ५ व्या बैठकीमध्ये नाशिक जिल्हयातील त्र्यंबकेश्वर व पेठ या दोन तालुक्यातील आदिवासी क्षेत्रामध्ये ( पेसा ) पाणी व स्वच्छता विषयक कामांसाठी अभिप्रेरक ( Motivator) नियुक्त करुन त्यांना प्रशिक्षण देणे विषयीच्या प्रस्तावास दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने नाशिक जिल्हयातील त्र्यंबकेश्वर व पेठ या दोन तालुक्यातील आदिवासी क्षेत्रामध्ये ( पेसा ) पाणी व स्वच्छता विषयीचे प्रशिक्षण राबविण्यास तसेच रु.१९,९२,०००/- (अक्षरी रु. एकोणीस लक्ष ब्यान्नव हजार ) एवढया रक्कमेस या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**योजनेचे स्वरुप व उदिष्टे:-**

पाणी आणि स्वच्छता क्षेत्रामध्ये महाराष्ट्रात गेल्या दहा वर्षात उल्लेखनिय असे काम झाले आहे शासनाचे स्वच्छ भारत अभियान आणि राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम हे दोन महत्वाचे कार्यक्रम आहे. या मध्ये हागणदारी मुक्त गांव निर्माण करणे व प्रत्येक कुटुंबाला पर्याप्त प्रमाणात स्वच्छ, शुध्द व शाश्वत पाणी उपलब्ध होणे हे मुख्य उद्देश आहेत. परंतु गांवपातळीवरील समस्यांचे प्रमाण पहाता प्रत्येक वेळी सर्व गरजा शासकीय यंत्रणेकडुन भागविल्या जाणे व ग्रामपंचायत स्तरावर सर्व समस्यांचे निराकरण करणेस शासकीय यंत्रणेस मर्यादा येतात. यामुळे उपरोक्त दोन्ही कार्यक्रम हे संख्यात्मक उद्दिष्ट पुर्ण करतांना दिसत असले तरी शौचालयाचा शास्वत व निरंतर वापर, स्वच्छतेच्या सवयी व पाणी उपलब्धतेतील छोटया छोटया अडचणी यामुळे स्वच्छता हि समाजाची निरंतर जिवन शैली न बनता हे कार्यक्रम संख्यात्मक उद्दिष्ट पुर्तीचे कार्यक्रम बनुन राहीले आहेत.

ग्रामपातळीवरील स्वच्छता सेवा केंद्राच्या माध्यमातून पाणी व स्वच्छतेसाठी आवश्यक साहित्य व सेवा पुरवठा साखळी निर्माण करुन हातपंप तंत्रज्ञ, हातपंप देखभाल दुरुस्तीसाठी आवश्यक साहित्य,सेवा व पाणी पुरवठा आणि स्वच्छता हया कामासाठी आवश्यक प्रशिक्षित कुशल मनुष्यबळ उपलब्ध करुन देणे व त्यामाध्यमातुन आदिवासी युवकांना रोजगार मिळवून देऊन त्यांचे पुनर्वसन करता येईल.

**उद्देश :-**

१. आदिवासी दुर्गम भागामध्ये पाणी व स्वच्छतेसाठी आवश्यक अशा सुधारित व शाश्वत सेवा उपलब्ध करुन देणे.
२. पाणी व स्वच्छता सेवा उपलब्ध करुन देऊन त्या माध्यमातून गावपातळीवर आदिवासी तरुणांमध्ये उदयोगशिलता वाढीस लावणे व त्यातून अर्थ प्राप्तीचे मार्ग उपलब्ध करणे.
३. पाणी व स्वच्छता क्षेत्रात काम करणा-या आदिवासी युवकांना सामाजिक प्रतिष्ठा प्राप्त करुन देणे.
४. पाणी व स्वच्छता सेवांशी निगडीत एक विकेंद्रित असा व्यवसाय ग्रामिण आदिवासी युवकांसाठी निर्माण करणे.

जागतिकीकरण आणि पाश्चातीकरण यामुळे ग्रामीण व आदिवासी जिवनावर ही परिणाम झाला असुन ग्रामीण आदिवासी जिवन झपाटयाने बदलत आहे, याचा परिपाक म्हणून आदिवासी भागातही मोबाईल दुरस्तीची दुकाने, दुरदर्शन संच दुरुस्तीचे दुकाने, ब्युटी पार्लस दिसतात परंतु हातपंप दुरुस्ती , तांत्रिक दृष्टया अचूक शौचालयाचे बांधकाम करणे, सांडपाणी व्यवस्थापन घनकच-याचे कम्पोस्टिंग यासाठी अजूनही ग्रामीण जनता शासकिय यंत्रणेवर अवलंबून आहे असे दिसुन येते. म्हणून पाणी व स्वच्छता सेवा हा स्वतंत्र व्यवसाय म्हणून नावारुपाला आणणे व त्यातुन पाणी व स्वच्छता क्षेत्रात शाश्वतता व निरंतरता आणणे आवश्यक आहे.

सदर कार्यक्रमाच्या अंमलबजावणीत खालील संस्था सहभागी असतील.

१. जिल्हा परिषद, नाशिक
२. युनिसेफ, मुंबई
३. शासन नियुक्त मुख्य सहाय्यकारी संस्था (केआरसी )

**ध्येय :-**

१. जिल्ह्यातील दळणवळणाच्या दृष्टीने दुर्गम आदिवासी वस्त्या व पाड्यांवर पाणी व स्वच्छतेशी निगडीत सुधारित सेवा सुविधा उपलब्ध करुन देणे.
२. आदिवासी समाजात पाणी व स्वच्छतेशी संबधित उपक्रमांच्या माध्यमातून आर्थिक व व्यावसायिक क्षमता निर्माण करुन ती वाढीस लावणे.
३. पाणी स्वच्छतेशी संबंधित सेवामध्ये काम करणेस तरुणांना आकर्षित करुन स्वच्छता क्षेत्रात काम करणा-यांना सामाजिक प्रतिष्ठा मिळवून देणे.
४. ग्रामपंचायत स्तरावरील पाणी व स्वच्छतेशी संबधित उपक्रमांचे विकेंद्रीत व्यावसायीक प्रारुप तयार करणे.

**उद्दिष्ट :-**

१. ज्या ग्रामिण युवकांना पाणी व स्वच्छता क्षेत्रातील उपक्रमांमध्ये काम करण्याची इच्छा व जिद्द आहे व जे युवक पाणी व स्वच्छता सेवा त्यांच्या जिवनोन्नतीसाठी एक योग्य पर्याय म्हणून स्विकारण्यांस तयार आहेत. अशा युवकामधील क्षमता ओळखून त्यांची निवड करणे.
२. अशा निवडलेल्या तरुणांना आवश्यक ते योग्य प्रशिक्षण देणे.
३. या युवकांना स्वयंरोजगार तत्वावर ग्रामिणस्तरावरील गरजांची प्रतिपुर्ती करण्याच्या दृष्टीने सर्व प्रशिक्षित करणे. उदा. शौचालय बांधकाम, दुरुस्ती, घनकचरा सांडपाणी व्यवस्थापन विषयक बाबी, स्वच्छता व दुरुस्तीसाठी आवश्यक साहित्याचा पुरवठा करणे इ.
४. पाणी व स्वच्छता क्षेत्रातील उपक्रमांना व त्यात सहभागी ग्रामिण तरुणांना सामाजिक प्रतिष्ठा मिळवून देणे.

कार्यान्वयन क्षेत्र :- (त्र्यंबकेश्वर आणि पेठ तालुका) नाशिक जिल्हा, महाराष्ट्र

कालावधी :- ९ महीने.

कार्यपध्दती :- (उमेदवारांची पडताळणी आणि निवड)

१. प्रकल्पात प्रथम ३० आदिवासी युवकांचा सेवा पुरवठादार म्हणून समावेश करण्याचा मानस आहे. जे ग्रामपातळीवर किंवा काही ग्रामपंचायतीचा समूह करुन समूह पातळीवर काम करतील आणि १० युवक तालुकास्तरावर पाणी व स्वच्छता क्षेत्रातील व्यवसायिक म्हणून काम करतील.
२. या प्रकल्पात गाव पातळीवर मोठ्या प्रमाणावर प्रसिध्दी देऊन वर्तमानपत्रात जाहीरात देऊन स्थानिक स्वराज्य संस्था, स्वयंसेवी संस्था यांच्या माध्यमातून प्रसिध्दी देण्यात येवुन पात्र उमेदवारांमधून प्रत्यक्ष मुलाखती घेऊन उमेदवार निवडण्यांत येतील.

आवश्यक पात्रता :-

१. शिक्षण - १० वी पास, १२ वी असलेला पण नापास झोलेला.
२. वय - १८ ते ३० (उमेदवाराच्या पात्रतेनुसार कमी जास्त होऊ शकते)
३. बेरोजगार युवकांना प्राधान्य

४. नाविन्यपुर्ण बाबी शिकण्याची आवड व स्वच्छता क्षेत्राला स्वजिवन्नोन्नतीचे किंवा उपजिविकेचे साधन म्हणेण निवडण्याची इच्छा असणे आवश्यक.

प्रशिक्षण कालावधी :- १ महिना

**अमंलबजावणी भाग १ :-**

१. शासन नियुक्त मुख्य सहाय्यकारी संस्था आणि युनिसेफ मिळून उमेदवाराची वस्तूनिष्ठ चाचणी घेऊन निवड यादी तयार करतील.
२. मुख्य सहाय्यकारी संस्था (K.R.C.) उमेदवार निवडीची प्रक्रिया पार पाडेल.

**अमंलबजावणी भाग २ :-**

शासन नियुक्त मुख्य सहाय्यकारी संस्थेकडून सर्व उमेदवारांना ३० दिवसांचे अत्यंत उपयुक्त असे व्यावसायिक प्रशिक्षण दिले जाईल, हे प्रशिक्षण निवासी असून खालील विषयांचा समावेश असेल.

- स्वच्छता :- महत्व, समाजातील स्थान, अव्हाने
  शौचालये, घनकचरा व सांडपाणी व्यवस्थापन, शाळा, आंगणवाडी स्वच्छता, स्वच्छता विषयात व्यावसायाच्या संधी इत्यादी.
- पाणी :- महत्व स्थान अव्हाने.
  पाण्याचे स्त्रोत , स्वच्छ व सुरक्षित पाणी हाताळण्याच्या पध्दती, शुध्दीकरण, जलस्त्रोतांची सुरक्षितता, हातपंप दुरुस्ती व व्यवस्थापन.
- मृदू कौशल्य :-
  संवाद क्षमता, तंत्रज्ञान, माहिती संवाद व शिक्षण साधने आणि त्यांचा वापर, व्यवसाय कौशल्य, लेखा विषयक ज्ञान, अहवाल सादरीकरण, किमान मोबाईल व संगणक कौशल्ये.

प्रशिक्षण पध्दतीमध्ये वर्गात शिकवल्या जाणा-या अभ्यांसक्रमासह प्रात्यक्षिक वर्ग, क्षेत्रिय भेटी व प्रत्यक्ष अनुभवातून प्रशिक्षण अंतर्भूत असेल.

**कालावधी** :- सुरवातीचे प्रशिक्षण - ३० दिवस

उजळणी (रिफ्रेशर कोर्स) - ५ दिवस

एकुण - ३५ दिवस

मुख्य सहाय्यकारी संस्था व युनिसेफ यासाठी सर्व तांत्रिक सहाय्य पुरवतील. मुख्य सहाय्यकारी संस्था वेळोवेळी युनिसेफ कडुन आवश्यक ते मार्गदर्शन पर साहित्य उपलब्ध करुन घेईल.

**अमंलबजावणी भाग ३ :-**

संस्थात्मक प्रशिक्षणानंतर प्रशिक्षणार्थी ३० दिवसांसाठी प्रत्यक्ष संबधीत गावामध्ये जावून काम करतील, त्यात खालील उपक्रमांचा समावेश असेल

१. सेवा पुरवठादार - गाव पातळीवर स्वच्छता विषयक कामाच्या व्यवसायिक संधी व शक्यतांचा शोध घेणे, या मध्ये शौचालय बांधकाम, सांडपाणी घणकचरा व्यवस्थापना, शाळा आंगणवाडी शौचालय दुरुस्ती व व्यवस्थापन, स्वच्छता साहित्य विक्रीच्या संधी, हातपंप दुरुस्ती इ.

२. व्यावसायिकता - काही ग्रामपंचायतीमिळुन सर्व साहित्य व सेवा यांचा आंतरभाव असलेले स्वच्छता विषयक व्यवयसाय केंद्र सुरु करण्याचा प्रयत्न प्रशिक्षणार्थि कडून केला जाईल. प्रशिक्षणार्थी त्याबाबतच्या सर्व शक्यता पडताळून पाहतील. त्यांना तालुकास्तरावर देखील प्रशिक्षण दिले जाईल, त्यात पाणी व स्वच्छता विषयक उपक्रमासंबधित मार्केट सर्व्हेक्षण आणि वन स्टॅाप शॉप स्थापन करण्याच्या सर्व शक्यता पडताळून पाहिल्या जातील.

३. युनिसेफ मुंबई व निर्मल K.R.C. क्षेत्रीय प्रशिक्षणाचे कालावधीत प्रशिक्षणार्थींना प्रशासकिय व तांत्रीक स्वरुपाचे सर्व सहाय्य पुरवतील. हे सहाय्य विशिष्ठ कालावधीनंतर प्रशिक्षणार्थींना भेट देण्यांत येईल. नाशिक जिल्हा परिषदेकडून आदिवासी भागातील ज्या ग्रामपंचायतींना स्वच्छ भारत मिशन व राष्ट्रीय पेयजल योजनेच्या वार्षिक कृती आराखडयात अंतर्भूत आहेत, अशा ग्रामपंचायतींना वारवार भेटी दिल्या जातील व कार्यालयीन परिपत्रकाद्वारे पथदर्शी प्रकल्पाबाबत अवगत केले जाईल.

कालावधी - १ महिना.

अमलबजावणी यंत्रणा - १. K.R.C., २. युनिसेफ मुंबई, ३. नाशिक जिल्हा परिषद - या सेवा पुरवठादारांना व व्यवसायिकांना स्वच्छ भारत मिशन व राष्ट्रीय पेयजल योजनेच्या कार्यक्रमाच्या माध्यमातून मुख्य प्रवाहात आणण्यासाठी सहाय्य करेल.

**अमंलबजावणी भाग ४** - संपर्क सत्र तथा उजळणी प्रशिक्षण वर्ग -

३० दिवसाच्या क्षेत्रीय प्रशिक्षणानंतर प्रशिक्षणार्थींना उजळणी प्रशिक्षण निर्मल ग्राम निर्माण केद्रात K.R.C. मार्फत दिले जाईल, याचा उद्देश क्षेत्रीय स्तरावर आलेले अनुभव कथन करणे, त्यावर चर्चा घडवुन आणणे, क्षेत्रीय स्तरावर काम करतांना उद्भवलेल्या समस्या व भविष्यात येवु शकणा-या समस्या यावर चर्चा घडवुन आणणे, समस्या सोडवण्याचे मार्ग शोधणे व सर्व शक्यतांचा वस्तुनिष्ठ विचार करणे. याशिवाय एक कृती आराखडा तयार करुन त्यानुसार पुढील ६ महिन्यासाठी प्रत्येक प्रशिक्षणार्थीने काम करणे, असा राहिल. यासाठी प्रशिक्षणार्थीस युनिसेफ तर्फे प्रशिक्षण भत्ता किंवा विद्या वेतन दिले जाईल,

कालावधी - ५ दिवस

अमलबजावणी यंत्रणा - १. K.R.C., २. युनिसेफ मुंबई , ३. नाशिक जिल्हा परिषद

**अमंलबजावणी भाग ५** - प्रशिक्षण पश्च्यात पथदर्शी क्षेत्रीय कार्य -

प्रत्येक सेवा पुरावठादारास ५ ग्रामपंचायती पथदर्शी स्वरुपात काम करणेसाठी दिल्या जातील. या ग्रामपंचायती प्राथम्याने पेसा क्षेत्रातील असतील, नाशिक जिल्हा परिषदेच्या माध्यमातुन या ग्रामपंचायतींची निवड केली जाईल. संबधीत ग्रमापंचायतींना आवश्यक ती सर्व माहिती जिल्हा परिषद नाशिक कडुन पुरविली जाईल व प्रशिक्षणार्थी सेवा पुरवठा दारांना सहाय्य पुरविणे बाबत निर्देशित केले जाईल.

<u>नियंत्रण व सहाय्य</u> :- या कालावधीत सेवा पुरवठादारांना काही समस्या उद्धवु शकतात तसेच त्यांचे कामावर नियंत्रणाची आवश्यकता असु शकते. हे नियंत्रण व सहाय्य K.R.C. व युनिसेफ मुंबई यांचे कडुन पुरविणेत येईल. यासाठी युनिसेफ व K.R.C. सेवा पुरवठादारांना भेटी देतील व त्यांच्या बैठका घेतील.

बिज भांडवल / फिरते भांडवल -

आर्थीक दृष्ट्या उपक्रमांना स्थैर्य व उपक्रमशीलता प्रदान करणेसाठी ६ महिन्याचे कालावधीसाठी दुकानाचे भाडे, दुरुस्तीचे उपकरणे, गणवेश उपलब्ध करुन देणे आवश्यक राहील यामुळे उपक्रमांस स्थैर्य लाभण्याची शाश्वती मिळेल.

कालावधी - ६ महिने

**अमलबजावणी यंत्रणा** - १. K.R.C.( key resource centre ) २. युनिसेफ मुंबई , ३. नाशिक जिल्हा परिषद

९ महिन्यानंतरचे अपेक्षित उपलब्धता -

१. ३० आदिवासी प्रशिक्षीत युवक स्वच्छ भारत मिशन व राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत आवश्यक असलेल्या पाणी व स्वच्छता विषयक सेवा दारो-दार जावुन पुरविणेस सक्षम असतील व त्या माध्यमातून गाव पातळीवर पाणी स्वच्छता पुरवठादार उपलबध होतील.
२. ग्रामपंचायतीमध्ये स्वच्छता विषयक कार्यक्रम राबविणेसाठी एक विकेद्रीत सेवा पुरवठा उपक्रम राबविण्यांत येईल, यामध्ये वैयक्तिक शौचालय, घनकचरा, सांडपाणी व्यवस्थापना, हातपंप दुरुस्ती यासाठी सेवा पुरवठादार उपलब्ध होतील.
३. प्रकल्प सुरु झाल्यानंतर २ वर्षाच्या कालावधीत अपेक्षीत उपलब्धता.
४. आदिवासी क्षेत्रातील ग्रामपंचायती हागणदारी मुक्त करणे.
**५.** जिल्हा आणि राज्यासाठी पाणी व स्वच्छता विषयक एक परिपुर्ण व सर्वसमावेशक प्रशिक्षणाचे व सामाजिक व्यवसायिकतेचे मॉडेल उपलब्ध करुन देणे.

**योजनेच निकष :-**

१) याकरीता आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच अपर आयुक्त, आदिवासी विकास , नाशिक यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्याचप्रमाणे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक यांच्या तांत्रिक नियंत्रणाखाली सदर प्रकल्प राबविण्यात यावा.

२) सदर योजनेचे मुल्यमापन मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक यांच्या मार्गदर्शक सूचनांनुसार करण्यात येईल.

**योजनेचा अपेक्षित खर्च :-**

| अ.क्र. | तपशील | अंमलबजावणी यंत्रणा | एकूण रक्कम |
|---|---|---|---|
| १ | प्रारंभिक जाहिरात | केआरसी | १५०००.०० |
| २ | आढावा बैठका (रु.२०००x ३) | केआरसी/जिल्हा परिषद | ६०००.०० |
| ३ | प्रारंभिक प्रशिक्षणार्थी निवड (Initial scouting /screening /selection of Trainees ) (रु.१०००X२ व्यक्तिX१० दिवस ) | केआरसी | २००००.०० |

| | | | |
|---|---|---|---|
| ४ | प्रशिक्षण अभ्यासक्रम विकसन ( Development of Training curriculum ) (Sanitation / Water and Communication ) ( रु.१५०००X३ व्यक्ति ) | केआरसी | ४५०००.०० |
| ५ | प्रशिक्षण ( Training )<br>अ) राहण्याचा व प्रशिक्षण साहित्याचा खर्च ( रु.६००x ४० लाभार्थी x ३५ दिवस = ८,४०,०००/-) (सहभागी होण्याच्या प्रमाणानुसार )<br>ब) प्रशिक्षण देणारे व्यक्तिंचे मानधन/संस्थेचा खर्च/व्यावहारीक/प्रात्यक्षिके/ कामगार इ. ( रु.१९५०००/- ) (प्रशिक्षणार्थी प्रमाणे बदलनार नाही )<br>क) गणवेश ( रु.५०० x ४० प्रशिक्षणार्थी )<br>ड ) दुरुस्तीची उपकरणे (रु.५०००x ४० प्रशिक्षणार्थी )<br>ई ) एकाच ठिकाणी दुकान भाडयाने पहिल्या ६ महिन्याकरीता ( रु.४०,००० ) | केआरसी | १२,९५,०००.०० |
| ६ | एक महिना प्रशिक्षण क्षेत्रात कामाचे दर<br>( रु.१०००x ३ व्यक्तिx १० दिवस = ३०,०००/-)<br>त्यानंतरच्या पुढील प्रशिक्षणाचे दर (Hand Holding Support During Post Training field work )<br>( रु.१०००x २ व्यक्तिx १० दिवसx६ महिने = १,२०,०००/-) | केआरसी | १५००००.०० |
| ७ | प्रकल्प आधार खर्च<br>प्रवास आणि गतिशिलता खर्च (Travel & Mobility Exp.) ( रु.२०००x १०० दिवस = २०००००/-)<br>संवाद खर्च (communication exp. ) ( स्टेशनरी, टेलिफोन, मोबाईल ईमेल व इंटरनेट ) (रु. ४०००X ९ महिने= ३६००० )<br>प्रकल्प समन्वयकाचे मानधन ( रु.२५०००x ९ महिने = २२५०००/-) | केआरसी | ४६१०००.०० |
| | **एकूण -** | **( अक्षरी एकोणीस लक्ष ब्यान्नव हजार )** | **१९,९२,०००.००** |

सदर योजनेसाठी होणारा खर्च मागणी क्र.टि-५, २२२५-अनुसूचित जाती,अनुसूचित जमाती व इतर मगासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना -०२, अनुसूचित जमातीचे कल्याण -७९६, जनजाति क्षेत्र उपयोजना (०१) जनजाति क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना- (०१) (५३)आदिवासी कक्षामार्फत राज्यातील अनुसूचित क्षेत्रामध्ये पथदर्शी प्रकल्पाची अंमलबजावणी ( २२२५-डी ३६९ )-३१ सहाय्यक अनुदाने ( वेतनेतर ) या लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ या चालू आर्थिक वर्षाकरीता केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

सदर शासन निर्णय, वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक -अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/ अर्थ-३, दिनांक १७ .४.२०१५ मधील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची पुर्तता होत असल्याचे प्रमाणित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www. maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१५०६३०१६४२०९०७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

Laxmikant G Dhoke

Digitally signed by Laxmikant G Dhoke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Laxmikant G Dhoke
Date: 2015.07.01 11:44:55 +05'30'

**( ल.गो. ढोके )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. महालेखापाल लेखापरिक्षा , ( लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र -१, मुंबई
४. महालेखापाल लेखापरिक्षा , ( लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-२, नागपूर,
५. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
८. जिल्हाधिकारी, नाशिक
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक
१०. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
११. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नाशिक
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक
१३. वॉश ऑफिसर, यनिुसेफ, मुंबई
१४. सर्व उप सचिव/अवर सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. कक्ष अधिकारी, (का-६ ) अर्थसंकल्प शाखा, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई
१६. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. निवड नस्ती कार्यासन-१६